**जी.डी.सी. ॲण्ड ए. परीक्षेसाठी मंजूर केलेल्या २ अस्थायी पदांना सन २०१५-१६ साठी मुदतवाढ देण्याबाबत**

**महाराष्ट्र शासन,**
**सहकार पणन व वस्त्रोद्योग विभाग,**
**शासन निर्णय क्र. राजस २४१५/ प्र.क्र.५६/ ५ स,**
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२,
दिनांक :- २० मार्च २०१५

<u>वाचा</u> :- १) शासन निर्णय क्र. राजस-१००८/ प्र.क्र.५३८/ ५-स, दि. ५.५.२०११
२) शासन निर्णय क्र. राजस २४१३/ प्र.क्र. ५९/ ५ स दि.११/४/२०१४
३) अपर निबंधक, सहकारी संस्था (प्रशासन), सहकार आयुक्त व निबंधक कार्यालय यांचे पत्र क्र. आस्थापना/कक्ष-१/जीडीसीअे/ अस्थायी पदे/मुदतवाढ/११३/२०१५, दि.९/२/२०१५
४) शासन निर्णय, वित्त विभाग, क्रमांक : पदनि -२०१५/प्र.क्र.५/१५/वित्तीय सुधारणा-१, दिनांक - २०.२.२०१५.

**<u>शासन निर्णय :-</u>**

जी.डी.सी. ॲण्ड ए. परीक्षेसाठी मंजूर केलेल्या २ अस्थायी पदांना दिनांक २८/२/२०१५ पर्यन्त पुढे चालू ठेवण्यास शासन निर्णय दि.११/४/२०१४ अन्वये मान्यता देण्यात आलेली आहे. प्रशासकीय कारणास्तव सदरची अस्थायी पदे पुढे चालू ठेवणे आवश्यक असून त्यांना सन २०१५-१६ करिता मुदतवाढ मिळणे आवश्यक आहे. सबब, सदर पदांपैकी कोणतेही पद सहा महिन्यांपेक्षा अधिक काळ रिक्त नाही तसेच शासन निर्णय दि.५/५/२०११ अन्वये निश्चित केलेल्या आकृतिबंधात उक्त पदांचा समावेश आहे, या अटीच्या अधीन राहून खालीलप्रमाणे २ अस्थायी पदांना दि.१/३/२०१५ ते २९/२/२०१६ पर्यत पुढे चालू ठेवण्यास शासन मान्यता देत आहे.

| अ.क्र | पदाचे नाव | पदाची संख्या |
|---|---|---|
| १ | मुख्य लिपिक | १ |
| २ | कनिष्ठ लिपिक | १ |
| | **एकूण** | **२** |

२. सदरहू पदावर होणारा खर्च "मागणी क्र.व्ही-२, २४२५-सहकार, ००१- संचालन व प्रशासन, (०१) (०१) सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था (द. २४२५००११)" या लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा व त्या लेखाशिर्षाखालील सन २०१५-२०१६ च्या मंजूर तरतुदीतून भागविण्यात यावा.

३. वित्त विभाग, शासन निर्णय, दि.२०/२/२०१५ अन्वये प्रशासकीय विभागांना प्रदान करण्यात आलेल्या अधिकारानुसार सदर शासन निर्णय निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०३२०१८१०५५०६०२ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

Pandurang S Deokar

Digitally signed by Pandurang S Deokar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Deputy Secretary, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Pandurang S Deokar
Date: 2015.03.20 18:25:09 +05'30'

**(पां. स.देवकर)**
**उपसचिव , महाराष्ट्र शासन**
सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग

प्रति,

१) सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था, महाराष्ट्र राज्य, पुणे,
२) महालेखापाल, महाराष्ट्र-१, मुंबई (लेखापरीक्षा/लेखा व अनुज्ञेयता),
३) जिल्हा कोषागार अधिकारी, पुणे,
४) वित्त विभाग (व्यय-२/अर्थसंकल्प-१९/ वित्तीय सुधारणा)
५) कार्यासन अधिकारी, १७-स, सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई - ३२
६) निवड नस्ती.